**विमुक्त जाती भटक्या जमाती आश्रमशाळेतील विद्यार्थ्यांना सुक्ष्म अन्नद्रव्य पूरक आहार पुरविण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन,
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
शासन निर्णय क्र.विभशा-२०१०/प्र.क्र.१४७/मावक-६,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
दिनांक :- ३१ मार्च, २०११.

**प्रस्तावना :-** महाराष्ट्र राज्यामध्ये विमुक्त जाती व भटक्या जमाती आश्रमशाळांमधील मुला-मुलींना देण्यात येणा-या सोयी-सुविधांमध्ये वाढ करण्याबाबत शासनाने निर्णय घेतलेला आहे.त्यानुसार विमुक्त जाती व भटक्या जमाती आश्रमशाळांमधील विदयार्थ्यांना सुक्ष्म अन्नद्रव्य पूरक आहार (Micro-Nutrients supplements) पुरविण्याचा प्रस्ताव विचाराधीन होता.

**शासन निर्णय** :- सामाजिक न्याय विभागातंर्गत विजाभज आश्रमशाळेतील प्रवेशित विदयार्थ्यांना सुक्ष्म अन्नद्रव्य पूरक आहार (Micro-Nutrients supplements) पुरविण्याबाबत मान्यता देण्यात येत आहे.
२. वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय,मुबंई यांच्या दरकरारावर असणा-या हिन्दुस्थान लॅबोरेटरिज मॅन्युफॅक्चरर्स ऑफ फार्मासिटीकल्स, बोरीवली, मुंबई व सिडलर रेमेडीज प्रा. लि., मुंबई यांचेकडून अनुक्रमे मायक्रो न्युटियन्ट व टोनेक्स आर्यन सिरप हा सुक्ष्म अन्नद्रव्य पूरक आहार (Micro-Nutrients supplements) दरकराराच्या अटी व शर्तीनुसार पुरविण्यात यावा.
३. विजाभज आश्रमशाळेतील प्रवेशित विद्यार्थ्यांना ९० दिवसाचा कोर्स करण्यासाठी आवश्यक सुक्ष्म अन्नद्रव्य पूरक आहार (Micro-Nutrients supplements) व त्याअनुषंगाने येणा-या खर्चाचा तपशील खालीलप्रमाणे आहे.

**अ- मायक्रो न्युटियन्ट**

| अ .क्र | विद्यार्थी संख्या | प्रतिदिन लागणारे औषधाचे प्रमाण (मायक्रो न्युटियन्ट ) | २०० ग्रॅमच्या एका बाटलीची किंमत | एका दिवसाचा येणारा खर्च | १०० दिवसाची येणारा खर्च | २५ दिवसासाठी येणारा खर्च |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २६५५३४ | प्रति दिन २० ग्रॅम याप्रमाणे ५३१०६८० ग्रॅम | रू.४९.५० | १३,१४,३९३ | १३,१४,३९,३०० | रू.३.२८ कोटी |

**ब- टोनेक्स आर्यन सिरप**

| अ. क्र | विद्यार्थी संख्या | प्रति दिन लागणाऱ्या औषधाचे प्रमाण | १०० मि.ली.च्या एका बाटलीची किंमत | एका दिवसासाठी येणारा खर्च | एका वर्षासाठी लागणारा खर्च | ६५ दिवसासाठी येणारा खर्च |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २६५५३४ | प्रति दिन १० मि.ली. या प्रमाणे २६५५३४० मि.ली. | रू.३४.५० | ९,१६,०९२ | ३३,४३,७३,६९० | रू.५.९५ कोटी |

उपरोक्त एकूण रू.९.२३ कोटी एवढया खर्चास पुढील अटी व शर्तीच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१) संचालक.विजाभज यांनी दरकरारानुसार वस्तु पुरवठयाबाबत अटी व शर्ती निश्चित कराव्यात.त्याअनुषंगाने त्यांच्याशी करारनामा करण्यात यावा.

२) सदर औषधाचा पुरवठा दोन टप्प्यात करण्यात यावा. पहिल्या टप्प्यात मायक्रो न्युटियन्टचा २५ दिवसाचा कोर्स व दुसऱ्या टप्प्यात टोनेक्स सिरपचा ६५ दिवसाचा कोर्स पुरविण्यात यावा.

३) संबंधित संस्थेने उपरोक्त पुरक आहाराचा पुरवठा जिल्हा स्तरावर करणे आवश्यक आहे.

४) संचालक,विजाभज,पुणे यांनी विजाभज आश्रमशाळेतील सर्व प्रवेशित विदयार्थ्यांना सुक्ष्म अन्नद्रव्य पूरक आहार (Micro-Nutrients supplements) पुरविण्याबाबत संबंधित संस्थेस पुरवठा आदेश देण्यात यावा.

**वरीलप्रमाणे विदयार्थ्यांना डोस देण्यासाठी पुढीलप्रमाणे दक्षता घ्यावी**

अ) औषधे /टॉनिक पुरवठा करताना प्रत्येक आश्रमशाळेवर नोंद ठेवावी.विदयार्थीनिहाय नोंद,डोसचे प्रमाण याची नोंद ठेवावी.

ब) **या** संदर्भात डोस कसा घ्यावा याबाबत आरोग्य विभागाचे अधिकारी व पुरवठादार यांचेकडून मार्गदर्शन घ्यावे.

क) मुदतबाहय औषध पुरवठा होणार नाही याची काटेकोरपणे काळजी घ्यावी.

ड) दररोज यासंदर्भात आश्रमशाळेच्या व्यवस्थापनाने लक्ष ठेवावे व त्यावर संचालक,विजाभज,पुणे, विभागीय समाजकल्याण अधिकारी व विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी यांनी सहनियत्रंण ठेवावे.

इ) काही तक्रारी / निकृष्ट माल प्राप्त झाल्यास तात्काळ विजाभज संचालनालयास व शासनास कळवावे.

मुख्य लेखाशिर्ष " २२२५ अनुसूचित जाती /अनुसचित जमाती, इतर मागासवर्गीयांचे कल्याण, ०३ मागासवर्गीयांचे कल्याण २७७ शिक्षण अंतर्गत (०१) (०१) स्वयंसेवी संस्थांना आश्रमशाळा व

मुलाद्योगोत्तर आश्रमशाळा चालविण्यासाठी सहाय्यक अनुदाने, (२२२५०७५३)" या योजनेसाठी सन २०१०-११ या आर्थिक वर्षाकरिता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक साकेतांक २०११०३३११५४३४७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सही/-

**( कृ.त्रिं.कदम )**

**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

*प्रति,*

*संचालक, विमुक्त जाती व भटक्या जमाती संचालनालय,महाराष्ट्र राज्य, पुणे,*
*महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर*
*सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद*
*सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी*
*सर्व विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी*
*सर्व समाजकल्याण अधिकारी,जिल्हा परिषद*
*सर्व जिल्हा कोषागार अधिकारी*
*मुख्य लेखापरिक्षक, स्थानिक निधी शाखा,मुंबई*
*सह संचालक, लेखा व कोषागारे,मंत्रालय, मुंबई ३२*
*निवड नस्ती, का/मावक-६*

*प्रत*

*मा.मंत्री (विजाभज) याचे खाजगी सचिव*